**गोदावरी मल्टीपरपज चॅरिटेबल ट्रस्ट, औरंगाबाद संचलित सिंधु मेमोरियल प्राथमिक विद्या मंदिर, सिल्लोड, सिल्लोड, ता. सिल्लोड, जि. छत्रपती संभाजीनगर (औरंगाबाद ) या शाळेस अनुदान मंजूर करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र. प्राशाअ-२०२३/प्र.क्र.२८१/एसएम-४,**
४ था मजला, मंत्रालय विस्तार, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मुंबई-४०००३२
दिनांक- २३ जुलै, २०२४

**वाचा:-**

(१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. माशाअ-२००९/५९९/०९/माशि-१, दि. १५ नोव्हेंबर, २०११
(२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. संकीर्ण-२०१२/(१५०)/१२)/माशि-१, दि. १६ जुलै, २०१३.
(३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. प्राशाअ-२०१३/(४२८)/२०१३)/प्राशि-३, दि. ३० नोव्हेंबर, २०१३.
(४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. माशामु-२०१६/ प्र.क्र. १८/ एसएम-४, दि. १९ सप्टेंबर, २०१६
(५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. प्राशाअ-२०२१/ प्र.क्र. १७/एसएम-४, दि. १५ फेब्रुवारी, २०२१
(६) शासन शुद्धिपत्रक्र क्र. प्राशाअ-१२१३/(४२८)/२०१३/प्राशि-३, दि. १ जून,२०२१ .
(७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. माशाअ-२०२२/प्र.क्र.२७५/ एसएम-४, दिनांक ०६ फेब्रुवारी, २०२३.
(८) शिक्षण संचालक (प्राथमिक), म.रा., पुणे यांचे क्र. प्राशिसं/खा.प्रा.शा.मु./५०४/२०९७/२१७८, दि. १२ मार्च, २०२४ चे पत्र

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र. (३) येथील आदेशान्वये, गोदावरी मल्टीपरपज चॅरिटेबल ट्रस्ट, छत्रपती संभाजीनगर (औरंगाबाद ) संचलित सिंधु मेमोरियल प्राथमिक विद्या मंदिर, सिल्लोड, सिल्लोड, ता. सिल्लोड, जि. छत्रपती संभाजीनगर (औरंगाबाद ) या शाळेचे इ. १ ली ते ७ वी (प्रथम तुकडी) अनुदानास पात्र करण्यात आली होती. सदर तुकडीवरील पदांना संदर्भ क्र. (४) येथील शासन निर्णयान्वये, २० टक्के अनुदान मंजूर करण्यात आले आहे.

त्यानुसार, शिक्षणाधिकारी (प्राथ.), जि.प. छत्रपती संभाजीनगर (औरंगाबाद ) यांनी दि.१०/३/२०१७ च्या पत्रान्वये, सदर शाळेच्या इ. १ ली ते इ. ७ वी (प्रथम वर्ग) करीता ८ पदांना २० टक्के अनुदान मंजूर केले आहे.

तसेच संदर्भ क्र. (६) येथिल शासन शुध्दिपत्रकान्वये, शासन निर्णयात उपरोक्त शाळेच्या इ. १ ली ते ७ वी ( प्रथम वर्ग) ऐवजी इ. १ ली ते ७ वी (प्रथम व दुसरी तुकडी) अशी दुरुस्ती करुन, त्यावरील १६ शिक्षक पदांना अनुदानास पात्र करण्यात आले आहे. त्यानुसार, सदर शाळेच्या इ. १ली ते ७ वी ( प्रथम व दुसरी तुकडी) वरील १६ पदांना २० टक्के अनुदान मंजूर करण्यात आले आहे.

शिक्षण उपसंचालक/ शिक्षणाधिकारी यांचेकडून प्राप्त झालेल्या माहितीच्या आधारे तपासणी समितीमार्फत तपासणी करुन, संदर्भ क्र. (५) येथील शासन निर्णय, दि. १५/२/२०२१ अन्वये, अनुदान पात्र शाळा तसेच त्रुटीमुळे अपात्र असलेल्या शाळांची यादी जाहीर करण्यात आली. त्यानुसार, अनुदान पात्र शाळा/वर्ग/तुकडी वरील शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दि.०१/११/२०२० पासून वाढीव २० टक्के वेतन अनुदान मंजूर करण्यात आले आहे.

तथापि, सिंधु मेमोरियल प्राथमिक शाळा, सिल्लोड, ता. सिल्लोड, जि. छत्रपती संभाजीनगर (औरंगाबाद ) या शाळेच्या इ. १ ली ते ७ वी (मूळ वर्ग) शासन निर्णय, दि.१५/२/२०२१ अन्वये वाढीव २० टक्के (४० टक्के) अनुदानासाठी पात्र शाळेच्या यादीत न आल्यामुळे, विभागीय शिक्षण उपसंचालक, छत्रपती संभाजीनगर विभाग यांनी दि. २४/२/२०२१ च्या पत्रान्वये, सिंधु मेमोरियल प्राथमिक शाळा, सिल्लोड, ता. सिल्लोड, जि. छत्रपती संभाजीनगर (औरंगाबाद ) या शाळेच्या इ. १ ली ते इ. ७ वी (प्रथम वर्ग) ४० टक्के अनुदानास पात्र यादीत समावेश करण्याबाबत प्रस्ताव सादर केला.

सदर शाळेच्या इ. १ ली ते ७ वी (दुसरी तुकडी) २० टक्के अनुदानास पात्र करण्याबाबतचे आदेश, दि.१/६/२०२१ रोजी काढण्यात आल्याने (म्हणजेच शासन स्तरावरील तपासणीनंतर), सदर शाळेच्या इ.१ ली ते ७ वी (दुसरी तुकडी) चा समावेश शासन निर्णय,दि. १५/२/२०२१ मध्ये झालेला नव्हता. तद्नंतर त्रुटीपूर्तता झालेल्या शाळांच्या यादीमध्ये सदरहू शाळेच्या इ.१ ली ते इ. ७ वी ( प्रथम वर्ग व दुसरा वर्ग ) समाविष्ट झाल्याने शासन निर्णय, दि.६/२/२०२३ नुसार या शाळेच्या इ. १ ली ते इ. ७ वी (प्रथम व दुसरा) वर्गास ४० टक्के अनुदान अनुज्ञेय आहे.

प्रस्तुत प्रकरणाच्या अनुषंगाने शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यानी संदर्भ क. (८) अन्वये शासनास प्रस्ताव सादर केला असून, प्रस्तावाची तपासणी व कागदपत्राची पडताळणी केल्यानंतर सदरहू शाळेच्या इ. १ ली ते ७ वी ( प्रथम व दुसरा वर्ग) दिनांक ०१/१/२०२० पासून वाढीव २० टक्के अनुदानास पात्र असल्याचे दिसून येत आहे. ही बाब विचारात घेता, सदरहू शाळेचे इ. १ ली ते ७ वी (प्रथम व दुसरा वर्ग) अनुदानास पात्र करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, गोदावरी मल्टीपरपज चॅरिटेबल ट्रस्ट, औरंगाबाद संचलित सिंधु मेमोरियल प्राथमिक विद्या मंदिर, सिल्लोड, सिल्लोड, ता. सिल्लोड, जि. छत्रपती संभाजीनगर (औरंगाबाद ) या शाळेची इ. १ ली ते ७ वी (प्रथम व दुसरा वर्ग) व दिनांक ०१.०१.२०२० पासून ४० टक्के अनुदानास व संदर्भ क्र. (७) येथील शासन निर्णयान्वये, दिनांक ०१.०१.२०२३ पासून ६० टक्के वेतन अनुदानास पात्र करण्यात येत आहे.

२. सदरहू शाळेस पूर्वलक्षी प्रभावाने अनुदानासाठी पात्र केले असले तरी, त्यांना उक्त कालावधीची कोणतीही थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही. सदरहू शाळेस सुधारीत टप्पानुसार (६० टक्के) वेतन अनुदानाचा लाभ शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अनुज्ञेय राहील. सदरहू शाळेस अनुदान वितरीत करण्यापूर्वी शासन निर्णय, दिनांक ०६.०२.२०२३ मधील विहित अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याची खातरजमा क्षेत्रीय अधिकारी यांनी करावी. तसेच, शासन निर्णय, दिनांक ०६.०२.२०२३ नुसार आधार प्रमाणित संचमान्यतेनुसार अनुज्ञेय असलेल्या पदांनाच वेतन अनुज्ञेय करण्यात यावे.

३. सदरहू प्राथमिक शाळेच्या उपरोक्त मंजूर पदांवरील खर्च त्यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशिर्षातून काढण्यात येत आहेत. त्याच लेखाशिर्षाखाली मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, याचा संगणक सांकेतांक क्र २०२४०७२३१५५६०१८०२१ असा आहे. हा शासन निर्णय, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2024.07.23 16:07:13 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री याचे प्रधान सचिव
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव.
४. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर
८. आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०. विभागीय शिक्षण उपसंचालक, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१२. शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, छत्रपती संभाजीनगर
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर
१४. निवड नस्ती, एसएम-४